**महाराष्ट्र कारागृह व सुधारसेवा विभागातील विहित शारीरीक क्षमताधारक कारागृह शिपाई ते तुरुंग अधिकारी श्रेणी-१ अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी प्रोत्साहन भत्ता योजना राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक : जेएलई १०१०/५३६/प्र.क्र. १८८/ पुर्नबांधणी क्र. १२०/ तुरुंग १ ( भाग-१)
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
दुसरा मजला, मंत्रालय-४०० ०३२
दिनांक : ०१ डिसेंबर, २०१६

वाचा :-

१) गृह विभाग,शासन निर्णय क्र.पीडब्ल्यू-१२०४/१४३/प्र.क्र.२/पोल-७, दिनांक ६ नोंव्हेंबर २००६
२) गृह विभाग,शासन निर्णय क्र.जेएलई-१०१०/ ५३६/ प्र.क्र.१८८/ पु.बां.क्र.१२०/तुरुंग-१, दिनांक २६ एप्रिल २०१६.
३) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे-१ यांचे पत्र क्र.अपोमसंवकामनि/पुणे/क-५/ पोप्रभत्ते/ १०४१७/२०१६, दिनांक ७/११/२०१६.

प्रस्तावना :

महाराष्ट्र कारागृह व सुधारसेवा विभाग पोलीस विभागाप्रमाणेच गुन्हेगारी प्रशासनाच्या यंत्रणेचा एक भाग असून त्यांचा अत्यावश्यक सेवेत समावेश होतो. त्यामुळे या दोन्ही विभागातील अधिकारी/कर्मचा-यांना देण्यात येणा-या सुविधेमध्ये समानता असणे आवश्यक आहे. सबब, पोलीस विभागातील अधिकारी/ कर्मचा-यांना लागू असलेल्या सुविधा/लाभदायी योजनांचा आढावा घेऊन त्या आवश्यकतेनुसार कारागृह व सुधारसेवेत कार्यरत गणवेषधारी अधिकारी/कर्मचा-यांना सुध्दा लागू करणे आवश्यक आहे.

महाराष्ट्र पोलीस विभागातील अधिकारी/कर्मचा-यांना लागू असलेल्या इतर सुविधा/ लाभदायी योजना कारागृह व सुधारसेवेतील गणवेषधारी अधिकारी/कर्मचा-यांना आवश्यकतेनुसार लागू करणेसाठी निर्णय घेणेकरीता अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भ क्र-०२ अन्वये समिती स्थापन करण्यात आलेली आहे व उपरोक्त समितीस पोलीस विभागाला लागू असलेल्या सर्व सुविधा/लाभदायी योजनांचा अभ्यास करुन त्या कारागृह व सुधारसेवेतील अधिकारी/कर्मचा-यांना लागू करण्यासाठी आवश्यकतेनुसार बदल करुन लागू करण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत.

त्या अनुषंगाने अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १९/११/२०१६ रोजी समितीची बैठक आयोजित करण्यात आलेली होती. सदर बैठकीमध्ये महाराष्ट्र पोलीस दलातील अधिकारी यांच्या प्रमाणेच महाराष्ट्र कारागृह व सुधारसेवेतील अधिकारी/कर्मचा-यांना प्रोत्साहन भत्ता योजना राबविण्याबाबत समितीने निर्णय घेतला आहे.

महाराष्ट्र पोलीस दलातील विहित शारीरीक क्षमताधारक पोलीस शिपाई ते पोलीस निरीक्षक या संवर्गातील अधिकारी/ कर्मचारी यांना प्रोत्साहन भत्ता योजना राबविण्यात येत आहे. सदर शासन निणर्यातील अटी व शर्ती पूर्ण केलेल्या पोलीस शिपाई ते पोलीस निरीक्षक या संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांना प्रतिमहा रुपये २५०/- प्रोत्साहन भत्ता देण्यात येतो. परंतु सदरचा प्रोत्साहन भत्ता महाराष्ट्र कारागृह व सुधारसेवा विभागातील कारागृह शिपाई ते तुरुंग अधिकारी श्रेणी-१ या संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांना देण्यात येत नव्हता.

कारागृह व सुधारसेवा विभाग, पोलीस विभागाप्रमाणेच गुन्हेगारी प्रशासनाच्या यंत्रणेचा एक भाग असून या दोन्हीही गणवेषधारी, शिस्तबध्द व अत्यावश्यक सेवा आहेत. तसेच, महाराष्ट्र पोलीस दलातील पोलीस शिपाई ते पोलीस निरीक्षक या संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्यासारखेच महाराष्ट्र कारागृह व

सुधारसेवा विभागातील कारागृह शिपाई ते तुरुंग अधिकारी श्रेणी-१ या संवर्गातील अधिकारी/कर्मचारी कर्तव्य बजावत आहेत.

तरी महाराष्ट्र पोलीस दलातील पोलीस शिपाई ते पोलीस निरीक्षक या संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांना प्रोत्साहन भत्ता योजना राबविण्यात येत आहे. त्याच धर्तीवर महाराष्ट्र कारागृह व सुधारसेवा विभागातील कारागृह शिपाई ते तुरुंग अधिकारी श्रेणी-१ या संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांना विहित शारीरीक क्षमताधारक अधिकारी/ कर्मचारी यांच्यासाठी प्रोत्साहन भत्ता योजना राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

महाराष्ट्र राज्यातील महाराष्ट्र कारागृह व सुधारसेवा विभागातील विहित शारीरिक क्षमताधारक कारागृह शिपाई ते तुरुंग अधिकारी श्रेणी-१ या संवर्गातील अधिकारी/ कर्मचारी यांच्याकरीता पुढीलप्रमाणे प्रोत्साहन भत्ता योजना राबविण्यास मान्यता देत आहे.

(१) या योजनेस महाराष्ट्र कारागृह व सुधारसेवा विभागातील विहित शारीरिक क्षमताधारक अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी प्रोत्साहन भत्ता योजना या नावाने संबोधण्यात यावे.

(२) या योजनेंतर्गत कारागृह शिपाई ते तुरुंग अधिकारी श्रेणी-१ या संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांना खाली दर्शविलेल्या अटी व शर्ती पूर्ण केल्यानंतर प्रतिमहा रुपये २५०/- या प्रमाणे मासिक प्रोत्साहन भत्ता त्यांच्या वेतनासोबत देण्यात येईल.

(३) या योजनेंतर्गत प्रोत्साहन भत्ता देण्यासाठी पुढीलप्रमाणे अटी व शर्ती राहतील:-

(अ) या योजनेंतर्गत लाभ घेण्यासाठी अधिकारी/कर्मचारी यांचे वय ३० वर्षे किंवा त्याहून अधिक असले पाहिजे.

(ब) या योजनेंतर्गत प्रोत्साहन भत्त्यास पात्र होण्याच्या प्रयोजनार्थ ३० वर्षापेक्षा अधिक वय असलेल्या व्यक्तींचे बॉडीमास इंडेक्स वैद्यक शास्त्रानुसार विहित केलेल्या पध्दतीप्रमाणे वजन (किलोमध्ये ) ÷ उंची २ (मीटरमध्ये) या सुत्रानुसार २५ पेक्षा जास्त नसावे.

(४) ही योजना सर्वस्वी ऐच्छिक स्वरुपाची असून या योजनेतंर्गत लाभ घेण्यासाठी वर नमूद केलेल्या संवर्गातील लाभ घेऊ इच्छिणा-या अधिकारी/कर्मचारी यांनी प्रत्येक वर्षी दिनांक १ जानेवारीपर्यत संबंधित कार्यालय प्रमुखांकडे अर्ज करणे बंधनकारक राहील.

(५) संबंधित कार्यालय प्रमुखांकडे अर्ज प्राप्त झाल्यानंतर,कार्यालय प्रमुख अर्जदाराची महाराष्ट्र कारागृह व सुधारसेवाबल कुटुंब आरोग्य योजनेंतर्गत करण्यात आलेल्या त्रयस्थ पक्षीय करारात अंतर्भूत असलेल्या रुग्णालयातून बॉडीमास इंडेक्सबाबत वैद्यकीय तपासणी करुन घेतील व त्याबाबतचे प्रमाणपत्र दिनांक १५ फेब्रुवारीपर्यंत प्राप्त करतील.

(६) संबंधित अर्जदाराने दिलेली माहिती,रुग्णालयाने दिलेले प्रमाणपत्र विचारात घेऊन प्रोत्साहन भत्ता देण्याच्या प्रयोजनार्थ पात्र ठरविण्यासाठी प्रत्येक घटक प्रमुखाच्या अधिनस्त पुढीलप्रमाणे समित्या राहतील.

अ) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य,पुणे-१ .

(१) विशेष पोलीस महानिरीक्षक (कारागृह)(मुख्यालय)/कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) :- अध्यक्ष.

(२) पोलीस उपअधीक्षक (दक्षता), अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक कारागृह व सुधारसेवा कार्यालय, महाराष्ट्र राज्य,पुणे- उपाध्यक्ष

(३) स्वीय सहाय्यक, अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक कारागृह व सुधारसेवा कार्यालय, महाराष्ट्र राज्य,पुणे :-सदस्य सचिव

(४) रचना व कार्यपध्दती अधिकारी, अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक कारागृह व सुधारसेवा कार्यालय, महाराष्ट्र राज्य,पुणे :- सदस्य

ब) विशेष पोलीस महानिरीक्षक (कारागृह),दक्षिण विभाग,भायखळा, मुंबई/कारागृह उपमहानिरीक्षक, नागपूर/पुणे/औरंगाबाद.

(१) विशेष पोलीस महानिरीक्षक (कारागृह)/कारागृह उपमहानिरीक्षक :- अध्यक्ष

(२) स्वीय सहाय्यक, (सर्व उपमुख्यालये) :- उपाध्यक्ष

(३) कार्यालयीन अधीक्षक :- सदस्य (सर्व उपमुख्यालये)

क) मध्यवर्ती कारागृहे/प्राचार्य,दौलतराव जाधव तुरुंग अधिकारी प्रशिक्षण महाविद्यालय, येरवडा, पुणे

(१) अधीक्षक/प्राचार्य :- अध्यक्ष

(२) उपअधीक्षक:-उपाध्यक्ष

(३) प्रशासन अधिकारी:-सदस्य सचिव

(४) कार्यालयीन अधीक्षक:-सदस्य

ख) जिल्हा कारागहे/ खुले कारागृहे/ खुली वसाहत, आटपाडी/ रत्नागिरी विशेष कारागृह/ प्राचार्य, किशोर सुधारालय, नाशिक

(१) अधीक्षक :- अध्यक्ष

(२) प्रशासन अधिकारी/कार्यालयीन अधीक्षक/वरिष्ठ लिपीक:-उपाध्यक्ष

(३) तुरुंग अधिकारी श्रेणी-१/२:- सदस्य

(७) सदरहू समित्या त्यांच्याकडे संदर्भित करण्यात आलेल्या सर्व अर्जाची तपासणी करुन त्यांच्या शिफारशी कार्यालय प्रमुखास यथास्थिती दिनांक २८/२९ फेब्रुवारी पर्यत सादर करतील.

(८) संबंधित कार्यालय प्रमुख समितीने केलेल्या शिफारशी विचारात घेऊन संबंधित कारागृह शिपाई ते तुरुंग अधिकारी श्रेणी-१ यांना १ एप्रिल पासून एक वर्षासाठी प्रोत्साहन भत्ता वेतनासोबत देण्यास पात्र ठरवतील. त्या पुढील वर्षाकरीता प्रोत्साहन भत्ता देण्यासाठी पात्र ठरविण्याकरीता कार्यालय प्रमुख वर नमूद केलेल्या कार्यपध्दतीचा पुन्हा अवलंब करतील.

(९) प्रोत्साहन भत्ता घेण्यास पात्र ठरणा-या व्यक्ती स्पष्टपणे निदर्शनास येणे सुलभ व्हावे याकरीता संबंधित अधिकारी/कर्मचा-याच्या गणवेषावर ओळखचिन्ह नमूद करण्याची कार्यवाही करण्याबाबत यथास्थिती अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक कारागृह व सुधारसेवा,महाराष्ट्र राज्य,पुणे-१ संबंधित कार्यालय प्रमुखांना सूचना देतील.

२. सदर योजनेची अमंलबजावणी करण्यासाठी होणारा खर्च कार्यालय प्रमुखांकडून कार्यान्वित केल्या जाणा-या (१) मागणी क्र.बी-५, मुख्यलेखाशिर्ष -२०५६ तुरुंग (००१) संचालन व प्रशासन (००) (०१) कारागृह निरीक्षणालय (२०५६००२६) (०१) वेतन (२) मागणी क्रमांक बी-५, मुख्य लेखाशिर्ष-२०५६ तुरुंग, (००) (१०१) तुरुंग (००)(०१) मध्यवर्ती तुरुंग (२०५६००३५) (०१) वेतन व (३) मागणी क्रमांक बी-५, मुख्यलेखाशिर्ष-२०५६,(००)(१०१) तुरुंग,(००)(०२)जिल्हा तुरुंग, (२०५६००४४) दत्तमत (०१) वेतन या लेखाशिर्षाखालील योजनेतर योजनेखाली केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. संबंधित कार्यालय प्रमुखांनी मार्च अखेरीस ज्या कारागृह शिपाई ते तुरुंग अधिकारी श्रेणी-१ या संवर्गातील अधिकारी/कर्मचा-यांना प्रोत्साहन भत्ता मंजूर करण्यात आला आहे. त्यांची नावे व दिलेली रक्कम याचा एकत्रित तपशिल अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक कारागृह व सुधारसेवा,महाराष्ट्र राज्य, पुणे-१ यांना दरवर्षी सादर करावा.

४. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य,पुणे-१ यांनी या योजनेच्या अंमलबजावणीच्या बाबतचा सविस्तर तपशिल शासनास एकत्रित सादर करावा.

५. सदर आदेश दि.०१.१२.२०१६ रोजी पासुन लागू राहील. ही योजना संबंधितांच्या निदर्शनास आणून देवून, त्यांना या योजनेतंर्गत लाभ घेण्यासाठी आवश्यक असलेली शारीरिक पात्रता जोपासण्यासाठी प्रवृत्त करण्याची संबंधित कार्यालय प्रमुखांनी कार्यवाही करावी.

६. सदर शासन निर्णय मंत्रिमंडळाने दिलेल्या मान्यतेनुसार गठीत करण्यात आलेल्या सक्षम समितीने घेतलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०११४२३०१३९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Manohar Bandpatte

Digitally signed by Manohar Bandpatte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=bb7b9a28cd6d8e2b1fa8f60d210258464e6ece204d02617fbb7ed6be3db6752c, cn=Manohar Bandpatte
Date: 2016.12.01 16:48:46 +05'30'

( म. रा. बंदपट्टे )
कक्ष अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्यमंत्री (गृह- शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
४) अपर मुख्य सचिव, (अ.व.सु), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव(वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य,पुणे-१
१०) कारागृह उपमहानिरीक्षक,मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद
११) अधीक्षक,मध्यवर्ती कारागृह (सर्व)
१२) प्राचार्य,दौलतराव जाधव तुरुंग अधिकारी प्रशिक्षण महाविद्यालय,पुणे.६
१३) अधीक्षक,जिल्हा कारागृह (सर्व)
१४) अधीक्षक,खुले जिल्हा कारागृह (सर्व)
१५) प्राचार्य,किशोर सुधारालय,नाशिक
१६) अधीक्षक,रत्नागिरी विशेष कारागृह,रत्नागिरी.
१७) संपर्क अधिकारी,स्वतंत्रपूर खूली वसाहत,आटपाडी जि.सांगली
१८) महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर
१९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
२१) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
२२) उपकोषागार अधिकारी (सर्व)
२३) गृह विभाग,बीयुडी-१,मंत्रालय,मुंबई-३२
२४) निवडनस्ती-तुरुंग-१